

कलिंगड वाहणारं गाढव
लेखक : माइकल



## अध्याय 1

जो-जो नावाचं एक गाढव होतं. त्याचे आई-वडील सुद्धा गाढव होते, म्हणूनच जो-जो सुद्धा एक गाढवच होता. भले त्याला तो गाढव असणं आवडत नसेल, आणि खरंचच, तो गाढव आहे हे त्याला आजिबात आवडत न्हवतं.

जो-जो ला पहाटेच त्याचं काम सुरु करावं लागे. त्याचा मालक त्याच्या पाठीवर एवढी कलिंगडं लादायचा की त्याला चालणं सुद्धा अवघड होई. मग त्याचा मालक त्याला गावाबाहेर घेऊन जाई. आणि धुळीने भरलेल्या रस्त्याने ते वेनिस नावाच्या शहराकडे जात.



जो-जो ला वेनिस शहर आवडायचं. हे त्याचं शहर होतं. त्याला तिथले कालवे आणि त्यावर बांधलेले पूल आवडायचे. तिथले चौक आणि छतांवरून येणाऱ्या चर्चच्या घंटेचा आवाज ही त्याला आवडायचा. तो अनेकदा घरांना येऊन धडकणाऱ्या लाटा पाहत थांबायचा. असं वाटायचं की लाटा शहराला खेचून समुद्रात नेऊ पाहत आहेत.



कालव्यासोबत जाणाऱ्या अरुंद रस्त्यांवरून पूर्ण दिवसभर त्याचा मालक त्याला हाकलत-हाकलत न्यायाचा. आणि जो-जो खिंकाळून आरोळ्या द्यायचा, “कलिंगड, कलिंगड, ताजे-ताजे कलिंगड घ्या”. त्याच्या अशाप्रकारे खिंकाळण्याचा आवाज सगळे चौक आणि गल्ल्यांमधून घुमायचा आणि सर्वांना कळायचं की कलिंगड वाहणारा गाढव जो-जो आला आहे आणि अनेक लोक पैसे घेऊन पळत-पळत कलिंगड घ्यायला यायचे. माशा पूर्ण वेळ जो-जो ला त्रास द्यायच्या आणि त्याच्या लाख प्रयत्नांनंतरही दूर व्हायच्या नाहीत.

जो-जो संध्याकाळच्या थंड हवेत ऑलीवच्या झाडाखाली आराम करायचा. हीच एक वेळ होती जेंव्हा त्याला त्याचा मालक आणि माशांपासून सुटका मिळायची. आणि शांत वाटायचं. तो निश्चिंत होऊन मातीत लोळायचा आणि आरामात झोपून जायचा.





## अध्याय 2

एक दिवस सकाळी त्याच्या मालकाने नेहमीप्रमाणे त्याला झोपेतून जागे केले.

“उठ, उठ, उठ, रिकामटेकड्या गाढवा.” तो ओरडला. “आजपासून शहरामागच्या गल्ल्यांमध्ये आपलं फिरणं बंद. आता आपण राजमार्गावर जायचं. मी ऐकलंय की सेंट मार्क्स चौकातले लोक कलिंगडाला दुप्पट भाव देतात. तिथे सगळे श्रीमंत लोक राहतात. कोण जाणे वेनिस शहराचा राजा, डोझ स्वतः माझी कलिंगडं घेईल.”

त्या दिवशी कलिंगडांचा भार थोडा जास्तच होता, पण जो-जोला त्याची चिंता न्हवती. अचानक त्याला वाटलं की त्याच्याबाबतीत काहीतरी चांगलं घडणार आहे.



जेंव्हा ते सेंट मार्क्स चौकात पोहोचले, तेंव्हा सूर्य आकाशात बराच वर आला होता. चौक लोकांनी गजबजला होता.

“माहिती नाही हे माझ्या आधी का लक्षात आली नाही,” त्याचा मालक कलिंगडं खाली उतरवत म्हणाला.

“आपल्यासाठी हीच चांगली जागा आहे, मोठया गिरीजाघराच्या बरोबर समोर. सगळी कलिंगडं लगेच विकली जातील. चल आरोळी दे, रिकामटेकड्या गाढवा, सगळयांना बोलाव.”

“कलिंगड, कलिंगड, कलिंगड घ्या!” जो-जो ने आरोळी दिली आणि पूर्ण चौकात त्याचा आवाज घुमायला लागला.

सेंट मार्क्समध्ये आलेले सगळे लोक वळून-वळून त्यांच्याकडे बघायला लागले. आणि एक व्यक्ती हसायला लागला. मग दुसरा हसला, मग तिसरा, आणि बघता-बघता सगळे हसायला लागले.

“का हसताय?” जो-जोच्या मालकाने विचारले. “तुम्ही याआधी पण गाढव पाहिलं असेल ना, नाही पाहिलं का? यात हसण्यासारखं काय आहे?”

“वर पहा,” त्यांनी ओरडून सांगितलं, “तुझ्या वरती पहा.” जो-जो आणि त्याच्या मालकाने वरती पाहिलं. त्यांच्या मागे सूर्यप्रकाशात चमकणारे, वेनिसचे चार सुवर्ण घोडे होते, जगातले सर्वात सुदंर चार घोडे. “सौंदर्य आणि पशु!” गर्दीतले लोक ओरडले. “सौंदर्य आणि पशु.” जो-जोने लाजेने मान खाली घातली.

लोक त्यांच्याकडे डोळे मोठे करून पाहत होते पण कोणीही कलिंगडं घेतली नाहीत. “तुझ्या गाढवाला मागच्या गल्लीत घेऊन जा, तुमची जागा तिथेच आहे,” ते म्हणाले. “आणि तुझी कलिंगडं पण घेऊन जा. आम्ही कलिंगड खात नाही, आम्हाला कलिंगडं आवडत नाहीत.”

जेंव्हा दुपारची घंटा वाजली, तेंव्हा डोझच्या महालाचा महाकाय दरवाजा उघडला आणि एक लहान मुलगी पळत-पळत सेंट मार्क्स चौकात आली.





"तुमच्या एका कलिंगडाची किंमत किती आहे?" तिने जो-जोच्या मालकाला विचारले.



एक आया त्या लहान मुलीच्या मागे-मागे धावत आली. "परत ये, परत ये," आया ओरडली. " तुला माहिती आहे ना, महालाच्या बाहेर जाण्याची तुला परवानगी नाही."
"पण मला कलिंगड हवंय," लहान मुलगी म्हणाली. "आणि तसंही त्या महालात दिवसभर बंद राहणं मला आवडत नाही. माझ्यासोबत खेळायला कोणी मित्रसुद्धा नाहीत आणि मला एकटीला करमत नाही."
"ही डोझची मुलगी आहे," कोणीतरी कुजबुजलं. सगळेजण पटकन वाकून तिला अभिवादन करायला लागले. पण त्यांच्याकडे दुर्लक्ष करून ती थेट जो-जोच्या जवळ कलिंगडांच्या ढीगापाशी आली.

"एवढा सन्मान, राजकुमारी, एवढा सन्मान," जो-जोचा मालक म्हणाला. "राजकुमारी, ही तर एक भेट आहे. संपूर्ण वेनिसमध्ये माझी कलिंगडं सर्वांत चांगली आहेत. राजकुमारी, हे तुमच्यासाठी आहे."



"राजकुमारी", आया डोजच्या मुलीच्या हाताला धरून ओढताना म्हणाली. "तू त्या घाणेरड्या जनावराला स्पर्श नाही केला पाहिजे, तुला दिसत नाही का त्याच्या संपूर्ण शरीरावर माशा घोंगावत आहेत? तुझ्या वडिलांना तू इथे दिसण्याआधी महालात परत चल." आणि ती त्या लहान मुलीला ओढत महालात घेऊन गेली.

जो-जोने स्वतःचे डोळे बंद केले आणि त्या लहान मुलीची प्रतिमा मनात साठवून ठेवली जेणेकरून तो तिला विसरणार नाही.





"धन्यवाद, डोजची मुलगी कलिंगड घेता-घेता म्हणाली. आणि तीने जो-जोकडे पाहिले.

"त्याचे डोळे किती उदास आणि दयाळू आहे," आणि तिने पुढे येऊन जो-जोची मान कुरवाळली. आज पर्यंत कोणीच जो-जोला असे कुरवाळले न्हवते. आनंदाने त्याचे पाय थरथरायला लागले.





त्या ग्रीष्म ऋतूमध्ये, जो-जो रोज भरपूर कलिंगडं घेऊन सेंट मार्क्स चौकात यायचा आणि मोठ्या गीरीजाघरासमोर चार सुवर्ण घोड्यांच्या खाली उभा राहायचा. आणि रोज दुपारी डोजची मुलगी तिचं कलिंगड घ्यायला यायची. जेंव्हा-जेंव्हा ती यायची तेंव्हा जो-जो कडे बघून हसणं विसरायची नाही. ती नेहमी त्याच्याशी प्रेमानं बोलायची आणि जायच्या आधी त्याच्या नाकावर हळुवार थोपटायची.

थोड्याच वेळात सगळी कलिंगडं विकली गेली. अचानक सेंट मार्क्स चौकात आलेला प्रत्येक प्रतिष्ठित व्यक्ती कलिंगड खात होता. शेवटी जी वस्तू डोजच्या मुलीला आवडते ती त्यांनाही आवडयला हवी.



## अध्याय 3

एका दुपारी त्याचा मालक चेहरा हॅटने झाकून पहुडला होता आणि शहरवासी दुपारच्या गरमीत निष्क्रिय झाले होते, तेंव्हा जो-जो नेहमीप्रमाणे सेंट मार्क्स चौकात असलेल्या चार सुवर्ण घोड्यांकडे बघत होता. त्या घोड्यांमध्ये जो-जोला हवे असलेले सगळे गुण होते, पण जो-जो ला ते मिळणं कधीच शक्य न्हवतं.

“ओह, मी तुमच्यासारखा का नाही बनू शकत?” तो ओरडून म्हणाला.

त्याचा मालक झोपेतून जागा झाला आणि त्याने गाढवाला जोरात मारले.

“मला झोपेतून जागं करण्याची तुझी हिम्मत कशी झाली?” तो खेकसला. “त्या घोड्यांशी बोलून काही फायदा नाही. ते पुतळे आहेत हे दिसत नाही का तुला?, आणि पुतळे बोलत नाहीत”

पण जो-जोला माहिती होतं की ते बोलू शकतात.



दुसऱ्या दिवशी सकाळी जेंव्हा जो-जो आणि त्याचा मालक चौकात आले, तेंव्हा वेनिसचा महान शासक महालाच्या खिडकीपाशी आला. बिगुल वाजला आणि डोजचं बोलणं ऐकायला सगळे एकत्र जमले.

"सगळे ऐका," डोज म्हणाला. "मी माझ्या मुलीच्या वाढदिवसाला शहरातला सर्वांत चांगला घोडा भेट देणार आहे. आणि घोडयाच्या मालकाला दहा हजार डूकैट दिले जातील. घोडयाची निवड आज दुपारीच केली जाईल, कारण आज माझ्या मुलीचा वाढदिवस आहे. घंटा वाजवा!"

चौकात येणाऱ्या घोडयांना जो-जो शांतपणे बघत राहिला. प्रत्येक घोडा अतिशय रुबाबदार होता, प्रत्येक घोड्याकडे बघून जो-जो स्वतःला आणखी खुजा आणि कुरूप समजत होता. तिथे काळे अरबी घोडे होते, जे जोरजोरात डोकी हलवत होते आणि फुरफुरत होते. तिथे भुऱ्या रंगाच्या स्पॅनिश घोडया होत्या, त्यांच्या मानेवर घनदाट- लांब केस होते आणि त्या दिमाखात चालत होत्या. थोडयाच वेळात तिथे शहरातले सगळे रुबाबदार घोडे आले आणि गर्दी सुद्धा झाली.



दुपारची घंटा वाजताच, महान डोज त्याच्या मुलीसोबत चौकात आला आणि एक भव्य संचलन (परेड) सुरु झाली. जसे-जसे घोडे चालायला लागले, लोक टाळ्या वाजवून जयजयकार करायला लागले.

आता वेनिसचे सगळे लोक डोजच्या मुलीची आवड जाणून घेण्यासाठी चुपचाप वाट बघू लागले.

“माझी मुलगी आज दहा वर्षाची झाली आहे,” तो म्हणाला. “आता ती एवढी मोठी झाली आहे की स्वतःच्या घोडयाची निवड स्वतःच करेल.” तो त्याच्या मुलीकडे वळला.

“ये बेटा,” तो म्हणाला. “सांग, तुला कोणता घोडा आवडला?”



डोजची मुलगी, रांगेत उभे राहून वाट पाहणाऱ्या घोड्यांच्या जवळून हळू-हळू चालत गेली. आणि शेवटी चार सुवर्ण घोड्यांच्या दिशेने बोट दाखवत ती म्हणाली, " जो तिथे आहे!"
"पण ते घोडे तू घेऊ शकत नाहीस," डोज हसत-हसत म्हणाला. "तू सुवर्ण घोडे घेऊ शकत नाहीस. हे तर वेनिसच्या जनतेचे आहेत. हे शेकडो वर्षांपासून इथेच आहेत."



"ते नाही बाबा," डोजची मुलगी म्हणाली. " मला तो पाहिजे, जो कलिंगडांपाशी उभा आहे."

गर्दीतल्या लोकांना धक्का बसला.
"पण ते तर एक गाढव आहे! तुला गाढव हवंय?" डोज मोठ्या आवाजात विचारलं.

"हो बाबा," डोजची मुलगी म्हणाली.
"हे शक्य नाही," डोज म्हणाला. "हे कदापि होऊ शकत नाही. पिस्सांनी भरलेल्या एखाद्या गाढवावर माझी मुलगी सवार होणं कधीही शक्य नाही!"

"मला त्याच्यावर बसून फिरायचे नाही, " डोजची मुलगी म्हणाली. "माझी इच्छा आहे की माझी त्याच्याशी मैत्री व्हावी. बाबा, माझ्याशी खेळायला कोणीही मित्र नाहीयेत. तुम्ही म्हणाला होता की मी कोणाचीही निवड करू शकते. आणि त्यावर पिस्सा नाहीयेत. तो सुंदर आहे. तो या सर्वांपेक्षा जास्त सुंदर आहे."
"माझ्याशी वाद घालू नकोस," डोज मोठ्यानी ओरडला. "तू सर्वांत रुबाबदार घोडा निवडू शकत होतीस पण तू हे घाणेरडं गाढव निवडलंस. बघ त्याचे पाय सुद्धा किती घाणेरडे आहेत."



"बाबा," डोजची मुलगी म्हणाली, तिचे डोळे पाणावलेले. "जर मी गाढव घेऊ शकत नाही तर मला दुसरं काही नकोय."

"ठीक आहे," डोज रागात बोलला, जर तुला हेच हवं असेल तर तुला कोणतीही भेटवस्तू मिळणार नाही. आत्ताच्या-आता महालातील तुझ्या खोलीत चालती हो."
पण डोजची मुलगी पळत जो-जो जवळ आली तिने जो-जोची मान पकडून त्याला मिठी मारली. "आज रात्री महालात ये," ती त्याच्या कानाजवळ तिचे तोंड नेत म्हणाली. "आणि माझ्या खिडकीच्या बाहेर वाट बघ. मी खाली येईन आणि मग आपण दोघे पळून जाऊ. नक्की ये, जो-जो. माझी निराशा करू नकोस."





जेंव्हा जो-जोचा मालक त्याला गर्दीतून ओढत घेऊन जात होता तेंव्हा लोक त्याला शिव्या देत होते, पण जो-जोला त्यांची अजिबात फिकीर न्हवती. जेंव्हा त्यांनी कलिंगडाच्या साली त्याच्या अंगावर फेकल्या तरीही त्याला काही फरक पडला नाही. जीवनात पहिल्यांदाच जो-जोला तो गाढव असल्याचा गर्व वाटत होता.

“अरे बिनकामाच्या गाढवा, मनात आनंदाच्या उखळ्या फुटून देऊ नकोस,” त्याचा मालक म्हणाला. “तू फक्त एक गाढव आहेस आणि ते ही एक बिनकामाचं गाढव, हे कधीही विसरू नकोस.”

एक गाढव नेहमी गाढवच राहत. आणि तुझ्यामुळे माझं खूप नुकसान झालंय, म्हणून आज रात्री तुला खायला काहीही मिळणार नाही. जर तू घोडा असतास तर मला आज दहा हजार डूकैत मिळाले असते आणि मी श्रीमंत झालो असतो. ऐकतोयस ना?”

जो-जोने सगळं ऐकलेलं, पण त्याने मालकाच्या बोलण्याकडे लक्ष दिले नाही. तो तर मनातल्या-मनात एक योजना आखत होता.







## अध्याय 4

त्या रात्री जो-जो झोपला नाही. तो खूप उत्साही होता. सगळीकडे सामसूम होईपर्यंत त्याने वाट पहिली. मग तो कामाला लागला. ज्या दोरीने त्याला झाडाला बांधून ठेवले होते, ती दोरी जो-जोने अंधाराचा फायदा घेत कापून टाकली. मग अतिशय काळजीपूर्वक चालत तो गाढ झोपेत बुडालेल्या गावाबाहेर आला आणि वेनिसला पोहोचला. त्या रात्री प्रचंड पाऊस आणि वादळी वारे होते. त्यामुळे कोणालाही रिकाम्या गल्ल्या आणि पुलांवरून जाताना जो-जोच्या पावलांचा आवाज आला नाही. सेंट मार्क्स चौक पार करून जो-जो डोजच्या महालाजवळ पोहोचला.



त्याला काही आवाज ऐकू आले. आधी त्याला वाटलं की तो आवाज शहरातल्या इमारतींमधून वाहणाऱ्या वाऱ्याचा आहे. पण नंतर त्याने वर पाहिलं. चारही सुवर्ण घोडे एकाच आवाजात बोलत होते. त्या वादळात त्यांचा आवाज फुसफूसल्यासारखा वाटत असला तरी स्पष्ट होता.

"लहान गाढवा, लहान गाढवा," ते म्हणाले. "आम्ही काय म्हणतोय ते ऐक, लहान गाढवा. समुद्राचं पाणी वर चढायला लागलंय. लोकांना जागं करून तू त्यांना सावध कर. लहान गाढवा, त्यांना सांग की ताबडतोप इथून निघून जा. पटकन! नाहीतर खूप उशीर होईल. जर तू त्याचं रक्षण केलं नाहीस तर सगळे बुडून मरतील. पटकन लहान गाढवा, पटकन!"

जो-जो वेगाने पळत-पळत चौक ओलांडून पाण्याकडे आला. त्याने खाडीच्या पलीकडे बघितले. त्याला समुद्राच्या लाटांचा आवाज आला. लाटा जवळ-जवळ येत होत्या. त्याच्या खुरांना पाणी आल्याचं जाणवलं.



पाणी चौकाकडे जाताना त्याला दिसलं. त्याने मान वर केली आणि एक खोल श्वास घेतला आणि जोरजोरात किंकाळायला लागला. तो त्याचं डोकं दुखेपर्यंत किंकाळत राहिला.





महालात तिच्या खोलीत डोजची मुलगी जो-जोची वाट पाहत होती. जेंव्हा तिने त्याच्या किंकाळण्याचा आवाज ऐकला तेंव्हा ती खाली आली. पळत-पळत ती त्याच्याकडे आली. "एवढ्या जोरात नाही, जो-जो," ती म्हणाली. "तू सर्वांना जागं करशील."

आणि मग तिला ही समुद्राच्या गरजण्याचा आणि जवळ-जवळ येणाऱ्या लाटांचा आवाज ऐकू आला.

तिच्या पायापर्यंत पाणी आलं होतं. मग तिच्या लक्षात आलं की जो-जो का ओरडत होता.

डोजच्या मुलीला जो-जोने पाठीवर बसवले. आणि तो किंकाळत शहराच्या गल्ल्यांमधून फिरून सर्वांना झोपेतून उठवू लागला.

“काय झालं?” खिडक्या उघडून अंधाऱ्या रस्त्यावर पाहत लोक ओरडले. “रात्री, यावेळी कलिंगडं विकायला आला आहेस का?”





“नाही, नाही!” डोजची मुलगी ओरडली. “समुद्राचं पाणी शहरात घुसलंय. पूर्ण शहरात पाणी भरलंय. स्वतःला वाचवा!”

दरम्यान समुद्राचं पाणी सगळीकडे भरत होतं. चौकात, मोठ्या गिरीजाघरात आणि डोजच्या महालात पूर आला होता. जो-जोच्या किंकाळण्याने लोक जागे होऊन स्वतःचा जीव वाचवण्यासाठी पळत होते.



कलिंगड वाहणारा गाढव जो-जो आणि त्याच्या पाठीवर बसलेल्या डोजच्या मुलीने लहान मुलं आणि म्हाताऱ्या माणसांना रस्ता दाखवत सुरक्षित ठिकाणी पोहचवलं. प्रत्येक क्षणाला शहरात पाण्याची पातळी वाढत होती. अनेक घरं वाहून गेली. चौकातलं घंटाघर सुद्धा पाण्यामुळे पडून उध्वस्त झालं.





"आपल्या शहरात एक म्हण आहे," डोज म्हणाला, "की जर कधी वेनिसच्या लोकांवर संकट आलं तर चार सुवर्ण घोडे लोकांचं रक्षण करतील. ही चांगली गोष्ट आहे, पण ही फक्त एक गोष्टच आहे. आपल्याला तर कलिंगड वाहणाऱ्या गाढवाने जो-जोने संकटातून वाचवलं आहे आणि हे आपण कधीच विसरता कामा नये."

जो-जो मनातल्या मनात हसला आणि अतिशय आनंदी झाला.

## अध्याय 5

सकाळ झाली तेंव्हा लोकांना कळलं की एकाही व्यक्तीचा जीव गेला न्हवता. कलिंगड वाहणाऱ्या जो-जोने वेनिसच्या लोकांचे प्राण वाचवले होते, आणि त्यामुळे सगळेजण त्याच्यावर प्रेम करायला लागले होते. लोकांनी डोजसमोर जो-जोची सुवर्ण प्रतिमा लावण्याचा प्रस्ताव मांडला. ते म्हणाले की जो-जोची प्रतिमा सेंट मार्क्स चौकात सुवर्ण घोड्यांच्या समोर लावा म्हणजे ते त्याला कधीही विसरणार नाहीत.

प्रतिमेच्या अनावरण कार्यक्रमात डोजने स्वतः जो-जोला फुलांचा हार घातला आणि त्याच्याबद्दल वाईट शब्द बोलल्याबद्दल त्याची माफी मागितली.



त्या दिवसानंतर जो-जो ला कधीच कोणतं ओझं उचलावं लागलं नाही. काही उचलावं लागलं असेल तर ते म्हणजे फुलांचे हार जे लोक त्याच्या गळ्यात घालत. कारण आता तो डोजच्या मुलीचा गाढव होता. आणि तुम्हाला माहिती आहेच की गाढव खूप काळ जगतो.



**समाप्त**